पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या अस्थायी पदास मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/ पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ मार्च, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-०१/२००१/प्र.क्र.४३/पोल-१अ, दि. ११.०५.२००१.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१अ, दि. २२.१०.२००९.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.रापोसे-१७१७/प्र.क्र.३७५/पोल-१अ, दि. २८.१२.२०१७.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एपीओ-३६१७/प्र.क्र.११७/पोल-३, दि. १०.०५.२०१८.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३६१८/प्र.क्र.१६/पोल-३, दि.२०.०९.२०२४.
६) पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/ मुदतवाढ/सपोमनि (आस्था)/८०/२०१६, दि.२९.०१.२०२५.
७) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**शासन निर्णय:-**

राज्य पोलीस दलाच्या पुनर्रचनेअंतर्गत उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथे नमूद दिनांक ११.०५.२००१ च्या शासन निर्णयान्वये पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त या संवर्गात ३० पदे निर्माण करण्यात आली असून, उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद ३० पदांपैकी अ.क्र.१३ ते १९ येथे नमूद अतिरिक्त समादेशक, राज्य राखीव पोलीस बल या ७ पदांचे उपरोक्त संदर्भाधिन क्र.२ येथे नमूद दिनांक २२.१०.२००९ च्या शासन निर्णयान्वये फेरवाटप करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर फेरवाटप केलेल्या ७ पदांपैकी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक पोलीस महानिरीक्षक (आस्था) या अस्थायी पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र.४ येथे नमूद दिनांक १०.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भाधिन क्र.४ येथे नमूद दिनांक १०.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सहायक पोलीस महानिरीक्षक (आस्थापना), हे पद अपर पोलीस महासंचालक(आर्थिक गुन्हे), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या पदात स्थानांतरीत/वर्ग करण्यात आले असून, हे पद अस्थायी स्वरूपाचे आहे. या पदास उपरोक्त संदर्भाधिन क्र.५ येथे नमूद दिनांक २०.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्र.६ येथे नमूद दिनांक २९.०१.२०२५ च्या पत्राव्दारे पोलीस

महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक (आस्था) या पदास दि.०१.०३.२०२५ पासून मुदतवाढ मिळणेबाबत विनंती केली आहे.

२. उक्त पदे ज्या परिस्थितीत निर्माण करण्यात आली होती ती परिस्थिती अद्यापही कायम आहे. यास्तव, उक्त पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस अधीक्षक या पदास **दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

३. उक्त खर्च गृह विभाग, मागणी क्र.“२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन (००)(०१)-पोलीस निरीक्षणालय” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो **सन २०२५-२६** या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक.,दिनांक ०३.०३.२०२५ व्दारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१७१७१९११८१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.03.17 17:20:13 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. गृह विभाग, कार्यासन (पोल-१अ).
६. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय  सुधारणा-१.
७. निवड नस्ती (पोल-३).